**राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान (NMSA) अतंर्गत कोरडवाहु क्षेत्र विकास (RAD) घटकाच्या सन २०१७-१८ च्या वार्षिक कृती आराखड्यास प्रशासकीय व रु.१६४१.६७ लक्ष रकमेच्या कार्यक्रमास वित्तीय मान्यता देण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः शाशेअ-२०१७/प्र.क्र.१५९/१७/४अे**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: १७ जुलै, २०१७

<u>वाचा-</u>

१) केंद्र शासनाने www.agricoops.nic.in या सांकेतिक स्थळावर निर्गमित केलेल्या राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानाच्या मार्गदर्शक सुचना.
२) शासन निर्णय क्रमांक ०३१७/प्र.क्र.१८/राकृवियो कक्ष, दि. १३ एप्रिल, २०१७
३) केंद्र शासनाचे पत्र क्र. १-७/२०१४-RFS-III, दिनांक १५ जून, २०१७ (तीन पत्रे)
४) केंद्र शासनाचे पत्र क्र. १-७/२०१४/RFS.III, दि. १९ जून २०१७.
५) कृषी आयुक्तालयाचे पत्र क्र.कृ.आ.आ.-२०१७/कोक्षेवि/प्र.मा/प्र.क्र.१/११७/रासक, दि.२१ जून, २०१७

<u>प्रस्तावना-</u>

राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत कोरडवाहु शाश्वत शेती विकास कार्यक्रम राज्यात राबविण्यात येत होता. सन २०१४-१५ पासून केंद्र शासनाने केंद्र पुरस्कृत योजनांची पुनर्रचना केली असून काही योजना एकत्रित करुन अभियानांतर्गत राबविण्याचे निश्चित केले आहे. सदर पुनर्रचनेमध्ये राष्ट्रीय सुक्ष्म सिंचन अभियान (NMMI), राष्ट्रीय सेंद्रीय शेती प्रकल्प (NPOF), राष्ट्रीय मृदा आरोग्य व सुपिकता व्यवस्थापन प्रकल्प (NPMSH&F) आणि कोरडवाहु शाश्वत शेती विकास कार्यक्रम (RADP) या सर्व योजनांचा समावेश राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानामध्ये केला आहे. त्यानूसार कोरडवाहू शाश्वत शेती विकास कार्यक्रम सदर अभियानामध्ये कोरडवाहु क्षेत्र विकास [Rain fed Area Development (RAD)] घटक म्हणून राबविण्यात येत आहे.

सन २०१४-१५ मध्ये सदर घटकासाठी केंद्र हिश्श्याचे प्रमाण १००% एवढे होते. सन २०१५-१६ पासून केंद्र व राज्य हिश्श्याचे अनुदानाचे प्रमाण ६०:४० असे आहे. केंद्र शासनाने संदर्भाधीन अ.क्र. ३ येथील पत्रान्वये सन २०१७-१८ या वर्षासाठी केंद्र हिस्सा रु. २५७६.४५ लक्ष व राज्य हिस्सा रु.१७१७.६३ लक्ष अशा एकूण रु. ४२९४.०८ लक्ष रकमेच्या कार्यक्रमास मान्यता कळविलेली आहे. त्याचप्रमाणे संदर्भाधीन अ.क्र. ४ येथील पत्रान्वये सर्वसाधारण प्रवर्गसाठी रु.९८५.००लक्ष, अनुसूचित जाती प्रवर्गासाठी रु.१४७.५०लक्ष, व अनुसूचित जमाती प्रवर्गसाठी रु.११७.५०लक्ष असा एकूण रु.१२५०.०० लक्ष एवढा निधी वितरीत केला आहे. त्यानुसार रु.४२९४.०८ लक्ष एवढया रकमेचा कार्यक्रम सन २०१७-१८ या वर्षात राबविण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्याचा व सर्वसाधारण प्रवर्गासाठी केंद्र हिश्श्यापोटी रु.९८५.०० लक्ष व त्याप्रमाणात आवश्यक राज्य हिस्सा रु.६५६.६७ लक्ष अशा एकूण रु.१६४१.६७ लक्ष एवढया रकमेच्या कार्यक्रमास वित्तिय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत कोरडवाहु क्षेत्र विकास (RAD) हा घटक सन २०१७-१८ मध्ये राज्यात राबविण्यासाठी केंद्र हिश्श्यापोटी रु. २५७६.४५ लक्ष (अक्षरी: रु. पंचवीस कोटी शहात्तर लाख पंचेचाळीस हजार फक्त) व राज्य हिश्श्यापोटी रु.१७१७.६३ लक्ष (अक्षरी: रुपये सतरा कोटी सतरा लाख त्रेसष्ठ हजार फक्त) अशा एकूण रु. ४२९४.०८ लक्ष (अक्षरी रु. बेचाळीस कोटी चौऱ्याण्णव लाख आठ हजार फक्त) एवढ्या रकमेच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर कार्यक्रमाची सर्वसाधारण प्रवर्गासाठी अंमलबजावणी करण्यासाठी केंद्र हिश्श्यापोटी रु.९८५.०० लक्ष (अक्षरी: रुपये नऊ कोटी पंच्याऐंशी लक्ष फक्त) व राज्य हिश्श्यापोटी रु. ६५६.६७ लक्ष (अक्षरी: रुपये सहा कोटी छपन्न लाख सदुसष्ट हजार फक्त) अशा एकूण रु.१६४१.६७ लक्ष (अक्षरी: रुपये सोळा कोटी एकेचाळीस लाख सदुसष्ट हजार फक्त) एवढया रकमेच्या कार्यक्रमास शासनाची वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर रक्कम खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावी व सदर खर्च सन २०१७-१८ च्या मंजुर तरतुदीतून भागविण्यात यावा.

**मागणी क्र.डी-३,**

२४०१-पीक संवर्धन,

१०९-विस्तार व प्रशिक्षण,

०१-माहिती व प्रसारण,

(०१)(५१)- अवर्षण प्रवण क्षेत्र कार्यक्रम (केंद्र हिस्सा)

(२४०१ ९५५४) ३३, अर्थसहाय्य.

**मागणी क्र.डी-३,**

२४०१-पीक संवर्धन,

१०९-विस्तार व प्रशिक्षण,

०१-माहिती व प्रसारण,

(०१)(५३)- कृषी उन्नती योजना - राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान - अवर्षण प्रवण क्षेत्र विकास कार्यक्रम व हवामान बदल शाश्वत शेती संनियंत्रण, प्रतिमानकरण व नेटवर्किंग कार्यक्रम (केंपुयो) (राज्य हिस्सा ४०%)

(२४०१ .ए२७२) ३३, अर्थसहाय्य

४. सदर योजनेची अंमलबजावणी केंद्र शासनाने निर्गमित केलेल्या राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानाच्या मार्गदर्शक सूचनांमधील अवर्षण प्रवण क्षेत्र घटकाच्या मार्गदर्शक सूचनांनूसार तसेच

संदर्भाधीन अ.क्र. २ येथील उन्नत शेती समृद्ध शेतकरी अभियानाच्या दि. १३ एप्रिल, २०१७ च्या शासन निर्णयातील मार्गदर्शक सूचनांनूसार करण्यात यावी.

५. प्रत्येक महिन्याला योजनेची भौतिक आणि आर्थिक प्रगती याबाबतची माहिती अद्ययावत करण्यात यावी व राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानाच्या मार्गदर्शक सूचनांसोबतच्या परिशिष्ट-३ मध्ये भरण्यात यावी व सदरची माहिती राज्य शासनाकडेसुद्धा पाठविण्यात यावी.

६. योजनेचा सविस्तर त्रैमासिक प्रगती अहवाल पुढील त्रैमासिकाच्या पहिल्या महिन्यांच्या १० तारखेपर्यंत त्याचप्रमाणे वार्षिक प्रगती अहवाल आर्थिक वर्ष संपल्यानंतर ३ महिन्यांच्या कालावधीत कृषी व सहकार विभाग, कृषी मंत्रालय, भारत सरकार यांच्याकडे तसेच राज्य शासनाकडे पाठविण्यात यावा.

७. सन २०१७-१८ मध्ये राज्यात सदर घटकाची अमंलबजावणी व सनियंत्रण करण्याच्या दृष्टीने निधी आहरण व वितरण करणेसाठी विविध स्तरावरील अधिकाऱ्यांना पुढीलप्रमाणे नियंत्रण तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

| अ. क्र. | स्तर | नियंत्रण अधिकारी | आहरण व संवितरण आधिकारी |
|---|---|---|---|
| १. | आयुक्तालय स्तर | संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषी आयुक्तालय,पुणे | सहाय्यक संचालक (लेखा-१) कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य पुणे. |
| २. | विभाग स्तर | संबंधित विभागीय कृषी सह संचालक | संबंधित विभागीय कृषी सह संचालक कार्यालयातील लेखाधिकारी |
| ३. | जिल्हा स्तर | संबंधित जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी | संबंधित जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी कार्यालयातील लेखाधिकारी |
| ४ | उप विभागीय स्तर | संबंधित उप विभागीय कृषी अधिकारी | संबंधित उप विभागीय कृषी अधिकारी |
| ५. | तालुका स्तर | संबंधित तालुका कृषी अधिकारी | संबंधित तालुका कृषी अधिकारी |

८. कोरडवाहु क्षेत्र विकास (RAD) कार्यक्रमाच्या उद्दिष्टपूर्तीसाठी संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी संदर्भाधीन अ.क्र. १ येथे नमुद केलेल्या केंद्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध असलेल्या सदर घटकाच्या मार्गदर्शक सुचना तसेच उपरोक्त नमूद अटी व शर्ती विचारात घेऊन उद्दिष्ट निहाय सविस्तर मार्गदर्शक सुचना क्षेत्रिय अधिकाऱ्यांना निर्गमित कराव्यात.

९. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दि. १८ एप्रिल, २०१७ व परिपत्रक क्र. अर्थसं-२०१७/प्र.क्र.९४/अर्थ-३, दि.३० जून, २०१७ अन्वयेविभागास प्रदान केलेल्या अधिकाराचा वापर करुन व सदर परिपत्रकातील अटी शर्तीची पूर्तता करुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०७१७१५४७४५०२०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sugriv Sambhaji Dhapate

Digitally signed by Sugriv Sambhaji Dhapate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d02297f9b5e889636956e39bfae4ea112e908c0e9a7e572d4190f9709a817f51, cn=Sugriv Sambhaji Dhapate
Date: 2017.07.17 15:44:52 +05'30'

**(सु.सं.धपाटे)**
उपसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. आयुक्त (कृषि),कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे
२. संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे
३. मा.मंत्री(कृषि व फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव
४. मा.राज्यमंत्री(कृषि व फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव
५. प्रधान सचिव (कृषि) यांचे स्विय सहाय्यक
६. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि उद्योग विकास महामंडळ, अंधेरी,मुंबई.
७. जिल्हाधिकारी (सर्व)
८. मुख्य कार्यकारी अधिकारी (सर्व जिल्हा परिषदा)
९. मुख्य कार्यकारी अधिकारी,वसुंधरा पाणलोट विकास यंत्रणा,पुणे
१०.सर्व संचालक, कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे
११.सर्व विभागीय कृषि सहसंचालक
१२.जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (सर्व)
१३.व्यवस्थापकीय संचालक, जिल्हा अग्रणी बँक (बँक ऑफ महाराष्ट्र, लोकमंगल ,पुणे)
१४.सर्व कृषि विकास अधिकारी/सर्व उपविभागीय कृषि अधिकारी/सर्व तालुका कृषि अधिकारी/
१५.सर्व मंडळ कृषि अधिकारी
१६.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१७.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षण) महाराष्ट्र -१/२ मुंबई/नागपुर
१८. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई
१९.संचालक, लेखा व कोषागार, मुंबई
२०.मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई, वाशी.
२१.उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा,कोकण/ नाशिक/पुणे/ औरंगाबाद/ अमरावती/नागपुर
२२.उप संचालक, लेखा व कोषागारे कोकण/नाशिक/पुणे/औरंगाबाद/अमरावती/नागपुर
२३.सर्व कार्यासने व पर्यवेक्षिय अधिकारी (कृषि) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय,मुंबई-३२
२४.निवडनस्ती.